**भूकंपग्रस्तांच्या पुनर्वसनाकरिता संपादित जमिनीचा मा. दिवाणी न्यायालयाने दिलेल्या निर्णयाच्या आधारे भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ नुसार वाढीव मोबदला अदा करण्यास्तव निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व- २०२५/प्र.क्र.८/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक: ३१ मार्च, २०२५**

**वाचा -**

१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. अ.क.वा./न्यायप्रकरण/१०९९/प्र.क्र.१५२/अ-२, दि. २४/१२/२००३
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र.-बीयुडी-२०१८/प्र.क्र.६७/ब-१, दि. ९/३/२०१८
३) उपायुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र जा.क्र. २०२४/पुनर्वसन/कक्ष-१/कावि-०१, दि. १०/०७/२०२४.
४) सह आयुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.२०२४/पुनर्वसन/कक्ष१/कावि ७४५, दि. १६/१०/२०२४.
५) जिल्हाधिकारी (भूसंपादन), जिल्हाधिकारी कार्यालय, लातूर यांचे पत्र जा.क्र. २०२४/भूसं/समन्वय/कावि-३१३/सिअर ०६, दि. २१/०५/२०२४.
६) उप आयुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र. २०२३/पुनर्वसन/कक्ष १/कावि, दि.१५/०१/२०२४.

**प्रस्तावना -**

धाराशिव व लातूर जिल्ह्यातील भूकंपग्रस्तांच्या पुनर्वसनाकरिता जमिनी संपादित करताना भूसंपादन अधिकाऱ्यांकडून मोबदला देण्याबाबत अंतिम निवाडे पारित करण्यात आले होते. सदर निवाड्यानुसार संबंधित भूधारकांना जमिनीचा मोबदला मान्य नसल्याने, त्यांनी भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ नुसार वाढीव मोबदला मिळण्याबाबत मा. दिवाणी न्यायालयामध्ये शासनाविरुद्ध प्रकरणे दाखल केली असता मा. दिवाणी न्यायालयाने भूधारकांना वाढीव मोबदला देण्याचे निर्णय दिले आहेत. त्यानुसार संपादित जमिनीचा वाढीव मोबदला अदा करण्याबाबत उपआयुक्त (पुनर्वसन), छत्रपती संभाजीनगर व जिल्हाधिकारी, लातूर यांच्याकडून संदर्भाधीन क्र. ३ ते ६ येथील पत्रांन्वये निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती करण्यात आली होती. सदर विनंतीच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

धाराशिव व लातूर जिल्ह्यातील भूकंपग्रस्तांच्या पुनर्वसनाकरिता संपादित जमिनीचा मा. दिवाणी न्यायालयाने दिलेल्या निर्णयाच्या आधारे भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ मधील तरतूदीनुसार पुढील तक्त्यात नमूद प्रकरणात वाढीव मोबदला अदा करण्याकरिता उपआयुक्त (पुनर्वसन), छत्रपती संभाजीनगर व जिल्हाधिकारी, लातूर यांनी मागणी केलेली रक्कम रूपये १,७९,८२,८६८/- (रूपये एक कोटी एकोणऐंशी लक्ष ब्याऐंशी हजार आठशे अडूसष्ट फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(रक्कम रूपयात)**

| क्र. | एलएआर क्र. | नांव | निधी मागणी | वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| १ | क्र.१२७१/२००९ | श्री.मारूती बाबाजी साळुंखे व इतर, रा. कोडाजीगड, ता. उमरगा, जि. धाराशिव | रु.१,५१,५२,७२०/- | रु.१,५१,५२,७२०/- |
| २ | क्र.९०६/१९९८ | श्री.पांडूरंग कृष्णा इंगळे व इतर, रा.सरवाडी, ता. निलंगा, जि.लातूर | रू.१०,५८,२२८/- | रू.१०,५८,२२८/- |
| ३ | क्र. ८२४/१९९८ | श्री.केरनाथ मारोती कांबळे व इतर, रा.सरवाडी, ता. निलंगा, जि. लातूर | रू. ८,९५,१७४/- | रू. ८,९५,१७४/- |
| ४ | क्र.५०४/२०१४ | श्री. ईश्वर निळकंठ कदम व इतर, रा.किल्लारी, ता. औसा, जि. लातूर | रू. ८,७६,७४६/- | रू. ८,७६,७४६/- |
| **एकूण** | | | **रू. १,७९,८२,८६८/-** | **रू. १,७९,८२,८६८/-** |

२. धाराशिव व लातूर जिल्ह्यातील भूकंपग्रस्तांच्या पुनर्वसनाकरिता संपादित जमिनीचा मा. दिवाणी न्यायालयाने दिलेल्या निर्णयाच्या आधारे भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ मधील तरतुदीनुसार वाढीव मोबदला अदा करण्यासाठी सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये १,७९,८२,८६८/- (रूपये एक कोटी एकोणऐंशी लक्ष ब्याऐंशी हजार आठशे अडूसष्ट फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-०९, मुख्य लेखाशीर्ष ४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च, ०१ पुनर्वसन, २०१ इतर पुनर्वसन योजना, (००) (००) (०१) इतर पुनर्वसन योजना (अनिवार्य) (४२३५ ०१०८) ५०-इतर खर्च (भारित)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांना खालील अटींच्या अधीन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी भूधारकांना अदा करण्यासाठी परिगणना केलेली

वाढीव मोबदला रक्कम अंतिम व योग्य असल्याची खातरजमा करुन, उपलब्ध करुन दिलेली उपरोक्त रक्कम भूधारकांना तात्काळ अदा करावी.

२) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी मा. न्यायालयाच्या निर्णयानुसार वाढीव मोबदला मंजूरीचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

३) अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर अनुदान खर्च होणार नाही याची विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी दक्षता घ्यावी.

४) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीपेक्षा जास्त निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५) मा. न्यायालयाचा निर्णयानुसार वाढीव मोबदला अदा करण्यास विलंब होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी. तसेच न्यायालयीन प्रकरण असूनही, मा. न्यायालयाच्या निर्णयानंतर एवढ्या विलंबाने निधी मागणी सादर करण्यास जबाबदार संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांचेवर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

६) सदरच्या आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/ PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादी कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

८) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

९) संबंधित अधिकारी यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

३. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनिमय, भाग-२, दि. १७.०४.२०१५ मधील वित्तीय नियमावली भाग पहिला, उपविभाग तीन, परिच्छेद क्र. २७ (२) अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५८/ व्यय-१०, दि. २१.०३.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३३११४५३५२४०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY
SHANKARRAO INGLE

Digitally signed by SANJAY SHANKARRAO INGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D337930B14433DC62C0154AF2BBC60BB5A6EDCAA66B7F34596C50A27EB0F6333, cn=SANJAY SHANKARRAO INGLE
Date: 2025.03.31 14:54:42 +05'30'

**( संजय इंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत-

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), छत्रपती संभाजीनगर
२. उप आयुक्त (पुनर्वसन), छत्रपती संभाजीनगर
३. जिल्हाधिकारी, लातूर.
४. उपविभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, धाराशिव.
५. उपविभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, लातूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी,धाराशिव.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर.
१०. महसूल व वन विभाग,कार्यासन ब-१, मंत्रालय, मुंबई ३२.
११. महसूल व वन विभाग,पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.